शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालयातील “सहाय्यक व्यवस्थापक” गट `ब` (राजपत्रित) या संवर्गातील पदावर पदोन्नतीने नियुक्ती

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्र.: पदोन्न-२०२१/प्र.क्र.१७३/उद्योग-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० मे, २०२२.

वाचा :- शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.गोप/कार्या-१अ/२८२/२०२१-२२, दिनांक ०६.१२.२०२१.

**शासन आदेश :-**

शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालयातील “कनिष्ठ सहाय्यक व्यवस्थापक-(गट `क`)” संवर्गातील खालील कर्मचाऱ्यांना “सहाय्यक व्यवस्थापक” (गट-ब) (सुधारित वेतनश्रेणी एस-१६ : ४४९००-१४२४००) या पदावर खालील परिच्छेद-२ येथे नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून त्यांच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविलेल्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून केवळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती व पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नांव व विद्यमान पदस्थापना | ज्येष्ठता क्रमांक | पदोन्नतीनंतर पदस्थापना करण्यात आली ते पद व कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.सु.ना.हजारे, कनिष्ठ सहाय्यक व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, कोल्हापूर | १ | सहायक व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई. |
| २. | श्री.एस.के.आढाव,कनिष्ठ सहाय्यक व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे | २ | सहायक व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे व व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व लेखनसामग्री भांडार, कोल्हापूर येथील अतिरिक्त कार्यभार. |
| ३. | श्री.अ.शि.गंगावणे,कनिष्ठ सहाय्यक व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद | ३ | सहायक व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर व व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद आणि सहायक संचालक, शासकीय लेखनसामग्री भांडार औरंगाबाद येथील अतिरिक्त कार्यभार. |
| ४. | श्री.सं.मा. ढवळे, कनिष्ठ सहाय्यक व्यवस्थापक, शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथागार, पुणे | ४ | सहायक व्यवस्थापक, शासकीय फोटोझिंको मुद्रणालय, पुणे. |

२. सदर तात्पुरती पदोन्नती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

i) निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.

ii) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./कार्या-१६ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे.

iii) दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका स्टँप ६८१९/२०२१ व इतर याचिकांवर मा. उच्च न्यायालयाने दि.२९.०६.२०२१, दि.०८.०७.२०२१ व दि.२२.०७.२०२१ रोजी दिलेल्या आदेशाच्या अधिन सदर निवडसूचीस मान्यता दर्शविण्यात येत आहे.

iv) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

v) निवडसूचीतील सर्व अधिकाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०१.०८.२०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषांची पूर्तता केली आहे, या अटीच्या अधीन सदर निवडसूचीस मान्यता दर्शविण्यात येत आहे.

vi) तात्पुरत्या निवडसूचीस शासनाची मान्यता घेण्यात आली आहे.

vii) सदर निवडसूचीतील सेवाज्येष्ठतानुसार पात्र असलेल्या, तथापि पदोन्नती नाकारलेल्या अधिकाऱ्यांच्या पदोन्नती संदर्भात या विभागाच्या दि.१२.०९.२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याची दक्षता संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांनी घ्यावी.

viii) सदर पदोन्नती अधिकाऱ्यांना त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी याव्दारे तात्काळ कार्यमुक्त करण्यात येत असून त्यांनी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू व्हावे. याबाबतचा रुजू अहवाल संबंधित पदोन्नत अधिकाऱ्यांनी संचालक, शासन मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय यांच्यामार्फत शासनास सादर करावा. तसेच त्यांनी अनधिकृतपणे रजेवर जावू नये. तसेच पदस्थापना रद्द अथवा त्यात बदल करणेसाठी कोणत्याही स्वरुपाचे आवेदन सादर करू नये. तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

ix) महाराष्ट्र नागरी सेवा(ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील २(ड) मधील तरतूदीनुसार पदोन्नतीने नियुक्त होणाऱ्या सदर अधिकाऱ्यांनी सदर आदेश निघाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांच्या विहित मुदतीमध्ये रुजू होणे आवश्यक आहे. सदर मुदतीमध्ये रुजू न झाल्यास संबंधित अधिकाऱ्याचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदिन(dias non) म्हणुन गणला जाईल, याची देखील संबंधितांनी नोंद घ्यावी.

३. हे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४३९/२०२१/का.१२, दि.०९.०२.२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

४.     सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०५१०१५२२२७०४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KARANSING PREMSING PATIL

Digitally signed by KARANSING PREMSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f2521c3a6d1f8429a3c2c9a42d575298ae82956908d63df441063695f377819, pseudonym=3A3CA4E4F15E12F04BF0F70BCA1F3C39DEE206CB, serialNumber=C7FEED7178D6C14666A5DF36811F1763590E65B6F836A87E63789DC234173D66, cn=KARANSING PREMSING PATIL
Date: 2022.05.18 15:32:07 +05'30'

**( क. प्रे. पाटील )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर,
३. मा.मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
६. सर्व सह सचिव/उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का.१२/का.१६ ब), मंत्रालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. अपर मुख्य सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहाय्यक., उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
११. श्री.सु.ना.हजारे, कनिष्ठ सहाय्यक व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, कोल्हापूर
१२. श्री.एस.के.आढाव, कनिष्ठ सहाय्यक व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे
१३. श्री.अ.शि.गंगावणे, कनिष्ठ सहाय्यक व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद
१४. श्री.सं.मा. ढवळे, कनिष्ठ सहाय्यक व्यवस्थापक, शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथागार, पुणे
(**संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालयामार्फत)
१५. निवडनस्ती.